न्यायालयीन प्रकरणाचे आदेश / न्याय निर्णय पारित केलेल्या दिनांकापासून शासनाकडे त्वरित / तातडीने पाठविण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शा. परिपत्रक क्रं. १/प्र.क्र.००७/विधि कक्ष**
हुतात्मा चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि. २ ऑगस्ट, २०२३

**प्रस्तावना :**

विभागातील न्यायालयीन प्रकरणे हाताळताना असे निदर्शनास आले आहे की विविध याचिकांमध्ये जेव्हा जेव्हा मा. उच्च न्यायालय वा अन्य न्यायालये आदेश / न्यायनिर्णय पारित करतात त्या आदेशाची / न्यायनिर्णयाची प्रत शासनाकडे बऱ्याच विलंबाने पाठविली जाते. त्यामुळे मा. न्यायालयाच्या आदेशावर / न्यायनिर्णयावर वेळेच्या आत विहित कालावधीत योग्य ती कार्यवाही केली जात नाही. परिणामस्वरुप शासनास / विभागीय सचिवास / संबंधित अधिकाऱ्यास वैयक्तिक ताशेरे, न्यायालय दंड, वर्तमानपत्रात अपप्रसिध्दी न्यायालीन अवमान, मानसिक त्रास, वेळेचा अपव्यय, पैशाचा अपव्यय यांना सामोरे जावे लागते.

२. असे प्रकार भविष्यात घडू नये यासाठी न्यायालयीन प्रकरणाचे आदेश / न्यायनिर्णय पारित केलेल्या दिनांकापासून शासनास त्वरित / तातडीने पाठविण्याबाबत परिपत्रक निर्गमित करण्यात येत आहे.

**कार्यालयीन परिपत्रक**

महाराष्ट्र शासनाचे इतर मागासवर्ग बहुजन कल्याण विभाग अथवा अधिनस्त क्षेत्रीय अधिकाऱ्यांमार्फत घेण्यात आलेले निर्णय वा काढण्यात आलेले आदेश यांना बरेचदा मा. सर्वोच्च न्यायालय / मा. मुंबई उच्च न्यायालय / मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण / शाळा न्यायाधिकरण ( School Tribunal) यांसमोर आव्हान देण्यात येते. अशा कोणत्याही प्रकरणात मा. न्यायालयाने / मा. न्यायाधिकरणाने अंतरीम किंवा अंतिम निर्णय दिला असेल त्या प्रकरणामध्ये मा. न्यायालयाच्या निर्णयाच्या अनुषंगाने वेळीच शासनस्तरावरील कार्यवाही पूर्ण करण्याच्या दृष्टीने याद्वारे खालीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत :-

(१) इतर मागासवर्ग बहुजन कल्याण विभागाच्या नोंदणी कार्यासन अधिकाऱ्यांनी, संबंधित न्यायालयीन प्रकरणाविषयी प्राप्त होणारे सर्व अंतरीम किंवा अंतिम आदेश, न्याय निर्णय थेट मा. सचिव (इतर मागासवर्ग बहुजन कल्याण विभाग) तसेच स.स. / उ.स. (विधी / व संबंधित स.स. / उ.स.) यांना चिन्हांकित करावेत व त्याच दिवशी मा. सचिव (इतर मागासवर्ग बहुजन कल्याण विभाग) व यांच्या टपालातून सादर करण्याची

दक्षता घ्यावी. टपालातून प्राप्त होणारे न्यायालयीन कामकाजासंबंधित प्रत्येक संदर्भ संबंधित कार्यासनाकडे पाठविताना सह सचिव (विधि) यांना ई-ऑफिसद्वारे पाठविण्याची दक्षता घ्यावी.

**(२)** कोणत्याही कार्यासनात किंवा सह सचिव / उप सचिवांकडे थेट प्राप्त होणारे मा. न्यायाधिकरणाचे / न्यायालयाचे निर्देश / अंतरीम आदेश / अंतिम निर्णय तात्काळ मा. सचिव (इतर मागासवर्ग बहुजन कल्याण विभाग) यांच्या निदर्शनास आणण्यात यावेत.

**(३)** ज्या प्रकरणी या विभागाविरुध्द दाखल न्यायालयीन प्रकरणात निर्देश / अंतरीम आदेश किंवा अंतिम निर्णय प्राप्त झाला असेल आणि अशा प्रकरणी विशिष्ट मुदतीत काही कार्यवाही पूर्ण करावयाचे किंवा निर्णय घेण्याचे निर्देश देण्यात आले असतील तर त्या प्रकरणी मुदतीत निर्णय घेण्याच्या दृष्टीने अविलंब संबधित कार्यासनाने प्रकरण सक्षम प्राधिकारी यांचे मान्यतेसाठी सादर करण्याची दक्षता कटाक्षाने घ्यावी.

**(४)** ज्या प्रकरणात मा. न्यायालयाचा / न्यायाधिकरणाचा निर्णय शासनाच्या विरोधात गेला असेल अशा प्रकरणात संबंधित सरकारी वकिलांचे / सादरकर्ता अधिकारी अभिमत प्राप्त करुन घेऊन अशा आदेशाविरुध्द अपील करणे आवश्यक असल्यास त्याबाबतच्या आपल्या स्वयंस्पष्ट प्रस्तावाची छाननी विधि व न्याय विभागाकडून विनाविलंब करुन घेवून त्या विभागाने दिलेल्या सल्ल्यानुसार अशा प्रकरणी पुढील कार्यवाही वेळेत पूर्ण करण्याची दक्षता घेण्यात यावी.

**(५)** ज्या प्रकरणात मा. न्यायालयाने / मा. न्यायाधिकरणाने ठरवून दिलेल्या मुदतीत निर्णय घेण्यास किंवा म्हणणे सादर करण्यास विलंब लागणार असेल अशा प्रकरणी कार्यासनात न्यायालयीन आदेशाची प्रत प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून केलेल्या कार्यवाहीचा तपशील घटनाक्रमानुसार नमुद करुन आवश्यक असलेल्या कालावधीसाठी मुदतवाढ मिळण्यासाठी सरकारी वकील / सादरकर्ता अधिकारी यांचेमार्फत संबंधीत मा. न्यायालयाकडे/ मा. न्यायाधिकरणाकडे न चुकता वेळीच अर्ज करुन मुदतवाढ मिळविण्यासाठी प्रयत्न करण्यात यावेत.

**(६)** मा. न्यायालयाने/मा. न्यायाधिकरणाने निर्णय घेण्याचा कालावधी वाढवून दिला असेल तर वाढीव कालावधीत शासनाकडून अपेक्षित कार्यवाही / निर्णय पूर्ण होईल किंवा शासनाचे शपथपत्र दाखल होईल याची दक्षता संबंधीत कार्यासनाने कटाक्षाने घ्यावी.

**(७)** सर्व पर्यवेक्षीय अधिकारी (सहसचिव / उपसचिव) यांनी वरील निर्देशांचे अनुपालन त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील कार्यासनांकडून केले जाईल, याची जातीने दक्षता घ्यावी, व या दृष्टीने त्यांच्या अधीनस्त कार्यासनांकडे प्रलंबित न्यायालयीन प्रकरणांचा नियमितपणे आढावा घ्यावा.

**(८)** शासन परिपत्रक १७.०१.२०२३ विधी व न्याय विभाग आणि शासन निर्णय १३.०७.२०२३ वित्त विभाग यांचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

**(९)** वरील सूचनांचे पालन न झाल्यास अथवा शासन स्तरावरील अपेक्षित कार्यवाही करण्यास विलंब झाल्यास, अशा प्रकरणी संबंधीत प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक विभाग), कार्यासन अधिकारी, सहायक कक्ष अधिकारी हे शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र राहतील याची कृपया सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

**(१०)** सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०२१५४६०९५१३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KISHOR
SHYAMRAO
BHALERAO

Digitally signed by KISHOR SHYAMRAO BHALERAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=260754581a6cfc87e9563a029636a04f8ebccbf2339be2be90192087d703baae, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=94524AB889E2FA9E6BFE5E1E58426881BC36B968FFD0F45CE2D4BD3FF527DED2, cn=KISHOR SHYAMRAO BHALERAO
Date: 2023.08.02 15:57:26 +05'30'

**(किशोर भालेराव)**
**सह सचिव (विधि)**
**इतर मागासवर्ग बहुजन कल्याण विभाग**

**<u>प्रत :-</u>**

१) मा. मंत्री यांचे स्विय सहाय्यक, इतर मागासवर्ग बहुजन कल्याण विभाग
२) मा. सचिव यांचे स्विय सहाय्यक, इतर मागासवर्ग बहुजन कल्याण विभाग.
३) सर्व कक्ष अधिकारी - अवर सचिव, उपसचिव, सह सचिव, इतर मागासवर्ग बहुजन कल्याण विभाग,
४) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग (सर्व),
६) सहायक आयुक्त, समाज कल्याण कार्यालय (सर्व),
७) प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
८) निवडनस्ती / विभाजन- १.